सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत येणाऱ्या सर्व शासकीय व अनुदानित आश्रमशाळांची तपासणी महिला अधिकाऱ्यांमार्फत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन परिपत्रक क्र.विभाशा -२०१६/प्र.क्र.३९३/विजाभज-२
मंत्रालय, विस्तारभवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १० नोव्हेंबर ,२०१६

परिपत्रक :-

राज्यात सामाजिक न्याय विभागांतर्गत विमुक्त जाती व भटक्या जमातीच्या प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी तसेच ऊसतोड कामगारांच्या मुलांसाठी स्वयंसेवी संस्थामार्फत अनुदान तत्वावर आश्रमशाळा चालविल्या जात आहेत. त्यानुसार राज्यात सद्यस्थितीत ५२८ प्राथमिक आश्रमशाळा, २९८ माध्यमिक आश्रमशाळा, १४८ उच्च माध्यमिक व १ विद्यानिकेतन अशा एकूण ९७५ आश्रमशाळा कार्यरत आहेत. त्याप्रमाणे अनुसूचित जातीच्या मुला-मुलींसाठी प्राथमिक १० व माध्यमिक ९ अशा एकूण १९ आश्रमशाळा आहेत. तसेच अपंग विद्यार्थ्यांकरीता १६५ विशेष शाळा चालविल्या जातात. नुकतीच बुलढाणा जिल्हयातील खामगाव तालुक्यातील पाळा येथील अनुदानीत आश्रशाळेमधील मुलींवर अत्याचार झाल्याची घटना निदर्शनास आलेली आहे.

२. याबाबत दि.८/११/२०१६ रोजी प्रधान सचिव (महसूल), सचिव, आदिवासी विकास विभाग व सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांनी सर्व जिल्हाधिकारी यांच्यासोबत झालेल्या व्हिडीओ कॉन्फरंसमध्ये सर्व जिल्हाधिकाऱ्यांना आवश्यक त्या सूचना दिलेल्याच आहेत.

३. आश्रमशाळेतील विद्यार्थीनींवर झालेल्या अत्याचाराच्या उपरोक्त घटनेची नोंद घेऊन सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या सर्व शासकीय व अनुदानीत आश्रमशाळांची तपासणी जिल्हयातील महसूल, महाराष्ट्र विकास सेवा, पोलीस व समाज कल्याण विभागातील महिला अधिकाऱ्यांमार्फत करण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे. सबब जिल्हाधिकारी यांनी संबंधित जिल्हयात उपलब्ध असलेल्या वरील विभागातील ४ ते ५ महिला अधिकाऱ्यांची समिती स्थापन करावी. जिल्हयातील सर्व आश्रमशाळांची तपासणी एका आठवडयात पूर्ण करण्यासाठी आवश्यक तेवढया एक किंवा दोन महिला अधिकाऱ्यांच्या समित्या स्थापन कराव्यात. जिल्हाधिकारी यांनी आयुक्त, समाज कल्याण, पुणे; आयुक्त, अपंग कल्याण, पुणे; संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, संचालनालय, पुणे यांच्या सहाय्याने महिला अधिकायांची समित्यांची स्थापना त्वरित करून तपासणीचा कालबध्द कार्यक्रम निश्चित करावा.

४. दिपावलीच्या सुट्टीनंतर आश्रमशाळा दि.१५/११/२०१६ रोजी सुरू होत असल्याने त्यापासून एक आठवडयात महिला अधिका-यांच्या समित्यांनी तपासणीचे काम पुर्ण करावे. सदर समितीने प्रत्येक आश्रमशाळेस भेट देऊन आश्रमशाळेतील मुलींसोबत आश्रमशाळेतील कर्मचाऱ्याच्या अनुपस्थितीत संवाद साधून त्यांच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने शाळेमध्ये पोषक वातावरण आहे किंवा कसे याचे मुल्यमापन करावे. सदर भेटीच्या वेळी आश्रमशाळेतील मुलींचा आत्मविश्वास व सुरक्षिततेची भावना निर्माण होण्यासाठी समितीने प्रयत्न करावेत. असे करीत असताना आश्रमशाळेतील

मुलींसोबत अनुचित प्रकार घडत असल्यास त्या मुलींना विश्वासात घेवून त्यांचेकडून सविस्तर माहिती करून घ्यावी. सदर माहिती घेताना कोणत्याही मुलींची माहिती गोपनिय राहिल याबाबत सर्वतोपरी दक्षता घेण्यात यावी.

५. महिला समितीने सदर तपासणीचे वेळी खालील बाबींचीही तपासणी करावी:-

१. मुलींसाठी राहण्याची स्वतंत्रपणे व पुरेशी व्यवस्था केलेली आहे किंवा कसे.
२. मुलींच्या वसतीगृहात पुरुषांना/विद्यार्थ्यांना जाण्यास मज्जाव केला जातो किंवा कसे,
३. मुलींच्या वसतीगृहासाठी स्त्री अधिक्षीकेचे पद भरलेले आहे का, स्त्री अधिक्षीका वसतीगृहात राहतात किंवा कसे ?
४. मुलींच्या वसतीगृहासाठी पहारेकरी/सुरक्षारक्षक आहेत किंवा कसे,
५. मुलींच्या वसतीगृहासाठी संरक्षक भिंत/कुंपण आहे किंवा कसे,
६. मुलींच्या वसतीगृहात प्रत्येक २० मुलींमागे एक याप्रमाणे शौचालय व स्नानगृहे आहेत काय ?
७. मुलींच्या वसतीगृहासाठी पुरेसा पाणी पुरवठा आहे किंवा कसे,
८. वसतीगृहातील खोल्या, शौचालय व स्नानगृह यांचे दरवाजे, खिडक्या सुस्थितीत आहेत काय,
९. वसतीगृहातील खोल्या, शौचालय, स्नानगृह, व्हरांडा येथे व परिसरात पुरेशी लाईटची व्यवस्था आहे का,
१०. पुरुष कर्मचाऱ्यांची निवासस्थाने मुलींच्या वसतीगृहापासून दूर आहेत का ?
११. मुलींना शाळेतील कर्मचारी/शिक्षक घरकामासाठी गैरवेळी बोलवितात का?
१२. मुलींचे वसतीगृहाबाहेर जाण्या-येण्यासंबंधीच्या नोंदी विहित केलेल्या नोंदवहीत घेतल्या जातात काय,
१३. आश्रमशाळेतील टोल फ्री नंबरचा तक्रार निवारणासाठी वापर करण्यात येतो का? याबाबत विद्यार्थ्यांमध्ये जागरूकता आहे का?

६. जिल्हाधिकारी यांनी महिला अधिकाऱ्यांच्या समित्यांनी करावयाच्या तपासणीबाबत संयुक्त बैठक घेवून त्यांना स्वत: मार्गदर्शन करावे व समित्यांना तपासणीचे काम विहित वेळेत पूर्ण करण्याबाबत सूचना द्याव्यात. समित्यांनी आपले अहवाल त्रोटक स्वरूपात न देता वस्तुस्थितीदर्शक व सविस्तरपणे **(सोबत दिलेल्या परिशिष्ठ अ प्रमाणे )** अहवाल द्यावेत. अहवालामध्ये आढळून आलेल्या त्रुटीसंदर्भात करावयाच्या उपाय योजनांबाबतही स्पष्टपणे नमूद करावे. सदर तपासणीमध्ये महिला अधिकाऱ्यांच्या समितीस संबंधीत आश्रमशाळेमध्ये काही अनुचित प्रकार होत असल्याचे आढळून आल्यास तसेच सदरहू आश्रमशाळा तेथे शिक्षण घेत असलेल्या विद्यार्थीनींची काळजी घेण्यास असमर्थ असल्याबाबत आढळून आल्यास समितीने अशी घटना जिल्हाधिकारी यांच्या निदर्शनास आणावी व जिल्हाधिकारी यांनी सदर प्रकरणी त्वरीत कार्यवाही करावी. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल आयुक्त, समाज कल्याण,आयुक्त अपंग कल्याण, संचालक, विजाभज इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे व शासनास सादर करावा.

७. महिला अधिकारी समित्यांनी आश्रमशाळांची तपासणी करुन आपला अहवाल जिल्हाधिकारी यांना दि. २२.११.२०१६ पर्यत सादर करावा. जिल्हाधिकारी यांनी सदरचे अहवाल आयुक्त, समाज

कल्याण,पुणे , आयुक्त, अपंग कल्याण, पुणे, संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, संचालनालय, पुणे यांचेकडे दि. २५.११.२०१६ पर्यंत सादर करावेत. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे, आयुक्त, अपंग कल्याण,पुणे, संचालक,विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, संचालनालय, पुणे, यांनी एकत्रीत अहवाल दि.३०.११.२०१६ पर्यंत शासनास सादर करावा.

८. उपरोक्तप्रमाणे करण्यात आलेली कार्यवाही दर तीन महिन्यांनंतर नियमितपणे करण्यात यावी.जेणेकरून आश्रमशाळा / विशेष कार्यशाळांमधील महिला विद्यार्थ्यांबरोबर होणाऱ्या अनुचित प्रकारांना आळा बसेल.

सदरचे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक क्र. २०१६१११८१७१५१२०१२२ असा आहे. सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

Jalandhar Madhav Gosavi

Digitally signed by Jalandhar Madhav Gosavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=010ebf10ad01f09c23969e1d80b48a44066a9122f464e555f80af35b24d57d93, cn=Jalandhar Madhav Gosavi
Date: 2016.11.18 17:22:03 +05'30'

**( जा.मा.गोसावी )**

**सह सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य**

**प्रत :-**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव.
३. मा. मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव.
५. सचिव सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग.
६. प्रधान सचिव (महसूल) यांचे स्वीय सहाय्यक
७. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. आयुक्त, अपंग कल्याण, पुणे
९. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, संचालनालय, पुणे.
१०.सचिव (ग्रामविकास) यांचे स्वीय सहाय्यक
११. जिल्हाधिकारी, सर्व
१२.पोलीस अधिक्षक, सर्व जिल्हे
१३.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरीषद सर्व

# परिशिष्ट – अ

## शासनामार्फत मुलींसाठी कार्यरत असलेल्या आश्रमशाळा/शासकीय निवासीशाळा/ अंपगांच्या विशेष शाळांची तपासणीचा नमूना

<table>
<tr><td>१</td><td>तपासणी पथकातील महिला अधिकारी व कर्मचारी यांचे नांव व हुद्दा</td><td>१<br>२<br>३</td></tr>
<tr><td>२</td><td>आश्रमशाळा/शासकीय वसतीगृहे/शासकीय निवासी शाळा/ अनुदानित वसतीगृहे यांचे नांव व पूर्ण पत्ता, दूरध्वनी क्रमांक</td><td></td></tr>
<tr><td>३</td><td>भेटीचा दिनांक व वेळ</td><td></td></tr>
<tr><td>४</td><td>मुख्याध्यापक/वसतीगृह अधिक्षिका यांचे नांव व पत्ता व दूरध्वनी क्रमांक व भ्रमणध्वनी क्रमांक</td><td></td></tr>
<tr><td>५</td><td>संस्थेचे नांव व पत्ता, दूरध्वनी क्रमांक</td><td></td></tr>
<tr><td>६</td><td>मुलींसाठी विशेष नियुक्ती केली असल्यास महिला अधिक्षिकेचे नांव</td><td></td></tr>
<tr><td>७</td><td>निवासी मुलीसंबंधीची माहिती</td><td>
<table>
<tr><td>अ. क्र.</td><td colspan="3">पटावरील मुलींची संख्या</td><td colspan="3">प्रत्यक्षात हजर मुलींची संख्या</td><td>अभिप्राय</td><td></td></tr>
<tr><td></td><td>निवासी</td><td>अनिवासी</td><td>एकूण</td><td>निवासी</td><td>अनिवासी</td><td>एकूण</td><td></td><td></td></tr>
<tr><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
</table>
</td></tr>
<tr><td>८</td><td>महिला अधिक्षिकेसाठी मुलींच्या निवासस्थांनामध्येच निवासव्यवस्था आहे काय ?</td><td></td></tr>
<tr><td>९</td><td>मुलींसाठी स्वतंत्र निवासव्यवस्था आहे का ?</td><td></td></tr>
<tr><td>१०</td><td>असल्यास, किती मुलींसाठी किती खोल्यांची निवास व्यवस्था करण्यात आली आहे ? क्षेत्रफळासह सविस्तर माहिती द्यावी.</td><td></td></tr>
</table>

| | | |
|---|---|---|
| ११ | मुलींसाठी स्वतंत्र स्थानगृहे/स्वच्छतागृहे उपलब्ध करुन दिली आहे काय ? त्यांची संख्या व क्षेत्रफळासह सविस्तर माहिती द्यावी. | |
| १२ | मुलींची गोपनीय नोंदवही/मासिक पाळी नोंदवही) ठेवली आहे काय ? ही नोंदवही महिला अधिक्षिका/कर्मचारी यांचेकडून नियमितपणे तपासली जाते काय ? | |
| १३ | नियमानुसार वर्षातून दोन वेळा मुलींच्या आरोग्याची तपासणी केली जाते काय ? | |
| १४ | मुलींना नियमानुसार स्वंतत्र बिछान्याची व्यवस्था केली काय काय ? | |
| १५ | मुलींना नियमानुसार भोजन साहित्य (ताट, वाटी) बकेट, मग इ. पुरवठा करण्यात आला आहे काय ? | |
| १६ | नियमानुसार मुलींची भोजनव्यवस्था केली आहे काय ? भोजन संबंधी मुलींची काही तक्रारी आहे काय ? | |
| १७ | शुध्द पिण्याच्या पाण्याच्या व्यवस्था आहे काय ? पाणी साठविण्याची व्यवस्था आहे काय ? | |
| १<br>८ | साठवणूकीच्या टाक्यांची नियमितपणे स्वच्छता केली जाते काय ? सक्षम अधिकाऱ्यांकडून पाण्याची तपासणी केली जाते काय ? | |

| | | |
|---|---|---|
| १९ | पुरेशी विद्युत व्यवस्था आहे काय ? अन्य पर्यायी व्यवस्था कोणती आहे ? | |
| २० | संस्थाप्रमुख अधिक्षिका/स्त्रीपुरुष कर्मचारी यांच्या संबंधी मुलीची काही तक्रार आहे काय ? असल्यास स्वतंत्रपणे लेखी तक्रार घ्यावी. | |
| २१ | मुलींच्या संगोपन व सुरक्षा विषयक तपासणी अधिकाऱ्यांचे संक्षिप्त अभिप्राय | |

तपासणी अधिकाऱ्यांचे नांव, पदनाम व स्वाक्षरी.